कोषागारातून रोख देय अनुदान
राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत केंद्र हिश्श्याचे अनुदान वितरीत करण्याबाबत...
(२२१५ ९८५३)

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** राग्रापे-२०१६ /प्र.क्र.५३ /पा.पु.१०
सातवा मजला ,गोकूळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, क्रॉफर्ड मार्केट जवळ, मुंबई ४०० ००१
दिनांक: २३ मार्च, २०१७

वाचा -

१) **पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाचे परिपत्रक क्रमांकः ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४ (अ) /पापु-७, दिनांक १७ मार्च २०१०**
२) **पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाचे परिपत्रक क्रमांकः ग्रापाधो-१११४ /प्र.क्र. ५२ /पापु-७, दिनांक १७ ऑक्टोबर २०१४**
३) **शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांकः बीयुडी-२०१६/प्र.क्र. ०६/कार्यासन-०६, दि. १७ मार्च २०१७**

**प्रस्तावना -**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत कव्हरेज व गुणवत्ताबाधित,देखभाल व दुरूस्ती यासाठी प्रगतीपथावारील पाणी पुरवठा योजना राबविण्यासाठी रू. ४.८८०५ कोटी एवढा निधी अनुसुचित जमाती या घटकासाठी लेखाशीर्ष २२१५ ९८५३ याखाली संबंधित अंमलबजावणी यंत्रणांना अनुदान मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय -**

यासंदर्भात राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत कव्हरेज व गुणवत्ताबाधित, देखभाल व दुरूस्ती यासाठी प्रगतीपथावारील पाणी पुरवठा योजना राबविण्यासाठी रू. ४.८८०५ कोटी (रूपये चार कोटी आठ्ठ्याऐंशी लक्ष पाच हजार मात्र ) एवढा निधी अनुसुचित जमाती या घटकासाठी लेखाशीर्ष २२१५ ९८५३ याखाली सबंधित अंमलबजावणी यंत्रणांना या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्राप्रमाणे संबंधित अंमलबजावणी यंत्रणांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर ( BEAMS ) मंजूर व मुक्त करण्यात येत आहे

**अटी :-**

१. संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी हे अनुदान राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत कव्हरेज व गुणवत्ताबाधीत तसेच देखभाल व दुरूस्तीच्या आदिवासी उपयोजनेच्या निश्चित वार्षिक कृती आराखडयात उपरोक्त घटकांसाठी समाविष्ट असलेल्या प्राथम्यक्रमानुसार येणाऱ्या तसेच ज्या केंद्रीय सहाय्यित योजनांमध्ये शासन सहभाग सक्तीचा करण्यात आलेला आहे अशा , भौतिक दृष्ट्या पूर्णत्वाकडे आलेल्या गावे/वाड्यांमधील योजनांची कामे पूर्ण करण्यासाठी प्राथम्याने खर्च करण्यात यावे. तसेच सदर अनुदान भौतिक दृष्ट्या पूर्ण परंतु आर्थिक दृष्ट्या अपूर्ण

गावे/वाड्या फ्लोराईड/आर्सेनिक, संसद आदर्श ग्राम, हागणदारीमुक्त गावे/वाड्यातील योजना पूर्ण करण्यासाठी प्राथम्याने खर्च करण्यात यावे.

२. संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत. या शासन निर्णयातील अटी व शर्तींची व NRDWP या योजनेंतर्गत केंद्र शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची संबंधित अंमलबजावणी यंत्रणांकडून पूर्तता होत आहे, याची शासनाला खात्री करुन घेता यावी, यासाठी महालेखापाल, महाराष्ट्र- १ /२, मुंबई/नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांना लेखा परीक्षणाकरिता संबंधित अंमलबजावणी यंत्रणांची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखापाल यांना त्यांचे काम योग्यरितीने पार पाडता यावे म्हणून संबंधित अंमलबजावणी यंत्रणा संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

३. शासन परिपत्रक ग्रामविकास विभाग क्र. आरसीएन-१८९/सी.आर.-३०२७/२८, दि. ५/९/९० मधील सूचनेप्रमाणे सदर अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित दिनांकांना संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी विभागीय आयुक्त, (विकास शाखा) यांना व कार्यासन पापु-१० /पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावे. त्याचप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई / नागपूर व पापु-१० कार्यासनास सादर करावे.

४. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार कव्हरेज व गुणवत्ताबाधीत देखभाल व दुरूस्ती याखाली हाती घेतलेल्या योजनांसाठीचा खर्च हा ५०% केंद्र निधीतून व ५०% राज्य निधीतून करणे आवश्यक आहे

५. केंद्र व राज्य हिश्श्यातून केलेल्या खर्चाची नोंद न चुकता ,IMIS या प्रणालीवर पुढील प्रमाणे नोंद घेण्यात यावी तसेच सदर नोंदी वेळोवेळी अद्ययावत करण्यात याव्यात .

क. भौतिक दृष्ट्या १००% पूर्ण परंतु आर्थिक दृष्ट्या अपूर्ण योजना.

ख. >७५ ते <१००% भौतिक दृष्ट्या पूर्ण.

ग. >५० ते <७५% भौतिक दृष्ट्या पूर्ण.

घ. >२५ ते <५०% भौतिक दृष्ट्या पूर्ण.

६. आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करून दिलेली सन २०१२-१३,२०१३-१४,२०१४-१५ आणि २०१६-१७ या वर्षांच्या आदिवासी उपयोजनेच्या कृती आराखडयात समाविष्ट असलेल्या गावांच्या योजनांसाठीच खर्च करावा. तसेच आदिवासी क्षेत्राबाहेरील क्षेत्रासाठी केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लोकांकरिता खर्च करण्यात यावी. आदिवासी उपयोजनेंतर्गत केलेली तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर किंवा सर्वसाधारण योजनेखाली खर्च करण्यात येवू नये. उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास वेळीच सादर करावीत .

७. सदर रक्कम त्वरित आहरीत करण्यात यावी.

या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधीकरण, मुंबई यांना मुक्त करण्यात आलेला निधी रू. २.८३०५ कोटी (रू. दोन कोटी त्र्याऐंशी लक्ष पाच हजार मात्र ) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक,(वित्त) (श्री. सुधाकर डांगे) यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व उपसचिव ,पाणी व स्वच्छता विभाग (श्री. रूचेश जयवंशी ) यांनी प्रतिस्वक्षरीत केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय , मुंबई यांना सादर करण्यात यावे. संचालक,(वित्त) (श्री. सुधाकर डांगे) यांना महाराष्ट्र जीवन प्राधीकरणाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच उपसचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (श्री. रूचेश जयवंशी ) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदरहू रक्कम एनईएफटी (NEFT) प्रणालीद्वारे महाराष्ट्र जीवन प्राधीकरण यांच्या खात्यात जमा करण्यात यावी.

यावर होणारा खर्च मागणी क्र. टी- ५, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०९), राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (केंद्र हिस्सा), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९८५३) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१६-१७ साठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभाग, क्र. बीयुडी-२०१६/प्र.क्र. ६/कार्यासन-०६, दि. १७ मार्च २०१७ अन्वये निधी वितरणाबाबत विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे. सदर प्रकरणी वित्त विभाग परिपत्रक दि. २०/०४/२०१६ मधील अनुक्रमांक ७ ते १८ येथील अटींची तसेच सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील क्र. ३ व ९ येथील बाबींची पूर्तता होत आहे. उपरोक्त रू. ४.८८०५ कोटी एवढा केंद्र निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाल्याबद्दलची खात्री वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेकडून करण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्र. २०१७०३२२१४५८५८२३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil Jairam Tumram

Digitally signed by Sunil Jairam Tumram
DN: CN = Sunil Jairam Tumram, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2017.03.23 15:29:36 +05'30'

( सुनिल ज. तुमराम )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता ),महाराष्ट्र- १,मुंबई

महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता ),महाराष्ट्र- १,नागपूर

आदिवासी विकास विभाग,कार्यासन -६/१४,मंत्रालय,मंबई.
आदिवासी विकास आयुक्त, नाशिक
अप्पर आयुक्त, आदिवासी विकास (सर्व).
अधिदान व लेखा अधिकारी ,मुंबई.
सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, संबंधित जिल्हा परिषदा
मुख्य लेखा व वित्त अधिकारी,संबंधित जिल्हा परिषदा
उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) संबंधित जिल्हा परिषदा
संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई, बेलापूर
संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई.
पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र. पा.पु.०४, पा.पु.२०.
निवडनस्ती पापु-१० कार्यासन.

# विवरणपत्र

| | | | | |
|---|---|---|---|---|
| शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. राग्रापे २०१६/प्र.क्र.५३/ पापु-१०, दिनांक : २२ मार्च २०१७ चे सहपत्र | | | | |
| ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांसाठी निधी वितरण (केंद्र हिस्सा) **(अनुसुचित जमाती) (लेखाशिर्ष २२१५ ९८५३)** | | | | |
| (रुपये लाखात) | | | | |
| अ.क्र. | अंमलबजावणी यंत्रणेचे नांव | घटक | | एकूण वितरीत रक्कम |
| | | कव्हरेज व गुणवत्ताबाधीत | देखभाल व दुरूस्ती | |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | महाराष्ट्र जीवन प्राधीकरण,मुंबई | २३९.८४ | ४३.२१ | २८३.०५ |
| २ | जिल्हा परिषद, नाशिक | २५.०० | ४.०० | २९.०० |
| ३ | जिल्हा परिषद, नंदूरबार | २५.०० | ४.०० | २९.०० |
| ४ | जिल्हा परिषद, नांदेड | ६०.०० | ११.०० | ७१.०० |
| ५ | जिल्हा परिषद, अमरावती | २५.०० | ४.०० | २९.०० |
| ६ | जिल्हा परिषद,भंडारा | ३५.०० | ७.०० | ४२.०० |
| ७ | जिल्हा परिषद,गोंदिया | ५.०० | ०.०० | ५.०० |
| एकूण | | ४१४.८४ | ७३.२१ | ४८८.०५ |
| (रूपये चार कोटी आठ्याऐंशी लक्ष व पाच हजार फक्त) | | | | |

Sunil Jairam Tumram

Digitally signed by Sunil Jairam Tumram
DN: CN = Sunil Jairam Tumram, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2017.03.23 15:30:05 +05'30'

(सुनिल ज. तुमराम )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन